ग्रामसेवकांचा पायाभूत व उजळणी प्रशिक्षण अभ्यासक्रम
सुधारित करणेबाबत - सन २०२२

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः टीआरजी २०२०/प्र.क्र.५१ /आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट,
मुंबई- ४०० ००१.
दिनांक : १३ एप्रिल, २०२२

वाचा -

१) शासन पत्र, क्रमांक प्रशिक्षण २००२/प्र.क्र.३६९/योजना-४, दिनांक ५.१०.२००२.
२) शासन पत्र, समक्रमांक, दिनांक १६.१२.२०२१.
३) उपमहासंचालक तथा संचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था, यशदा, पुणे यांचे क्र. राग्राविसं/१०२२/जीटीसी-पीआरटीसी/ग्राह, दिनांक ३१.१२.२०२२ चे पत्र.

प्रस्तावना :-

राज्यात सध्या ६ शासकीय ग्रामसेवक केंद्र, ३ अशासकीय ग्रामसेवक केंद्र, ११ अशासकीय पंचायत राज केंद्र व १ अशासकीय संयुक्त प्रशिक्षण केंद्र अशी एकूण २१ प्रशिक्षण केंद्रे कार्यरत आहेत. त्यापैकी ६ शासकीय व ३ अशासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांमार्फत पंचायत राज संस्थेमध्ये कार्यरत असणाऱ्या ग्रामसेवकांची कार्यक्षमता वाढविण्यसाठी ग्रामसेवकांना पायाभूत प्रशिक्षण व उजळणी प्रशिक्षण देण्यात येते .

ग्रामसेवकांचे पायाभूत प्रशिक्षण अभ्यासक्रम व उजळणी प्रशिक्षण अभ्यासक्रम संदर्भ क्रमांक १ अन्वये निश्चित करण्यात आले आहे. सदर अभ्यासक्रम सन २००२ मध्ये निश्चित कण्यात आला आहे. त्यामुळे या अभ्यासक्रमात काळानुरुप बदल करणे आवश्यक आहे. तसेच, वेळोवेळी केंद्र शासन व राज्य शासन यांच्याकडून नव्याने सुरु करण्यात आलेल्या योजना व उपक्रम यांचा देखील प्रशिक्षण कार्यक्रमात अंतर्भाव करणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने ग्रामसेवकांच्या पायाभूत प्रशिक्षण अभ्यासक्रम व उजळणी प्रशिक्षण अभ्यासक्रम यात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

ग्रामसेवकांच्या पायाभूत प्रशिक्षण अभ्यासक्रम व उजळणी प्रशिक्षण अभ्यासक्रम यात सुधारणा करण्यासाठी संदर्भ क्रमांक २ अन्वये संचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था यशदा, पुणे आणि प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, मांजरी फार्म, पुणे यांची द्विसदस्यीय समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीने या अभ्यासक्रमाशी संबंधित सर्व घटकांचा व बाबींचा विचार करुन ग्रामसेवकांच्या पायाभूत प्रशिक्षण अभ्यासक्रम व उजळणी प्रशिक्षण अभ्यासक्रम यात बदल करुन सुधारित ग्रामसेवक पायाभूत प्रशिक्षण अभ्यासक्रम व उजळणी प्रशिक्षण अभ्यासक्रम तयार केला असून तो परिशिष्ट अ व ब याप्रमाणे आहे. त्यानुसार ६ शासकीय ग्रामसेवक केंद्रे व ३ अशासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रे यांना सुधारित अभ्यासक्रमानुसार ग्रामसेवक पायाभूत प्रशिक्षण ( ४५ दिवस, १२ सुट्टया वगळून एकूण ३३ दिवस) आणि उजळणी प्रशिक्षण अभ्यासक्रम ( १२ दिवस, २ सुट्टया वगळून एकूण १० दिवस) घेण्यास मान्यता देण्यात येत आहे

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०४११११३१७२९९५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL SURYAKANT HANJE

Digitally signed by SUNIL SURYAKANT HANJE
DN: cn=SUNIL SURYAKANT HANJE, o=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, ou, email=usyoj4.rdd-mh@nic.in, c=IN
Date: 2022.04.13 13:33:41 +05'30'

(सुनिल हंजे)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा. मुख्यमंत्री याचे अपर मुख्य सचिव.
२) मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव

३) मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव.
४) मा. अ.मु.स. (ग्रि.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहायक.
५) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा/विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
६) मा. विधानसभा सदस्य /विधान परिषद सदस्य ( सर्व)
७) महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
८) संचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
९) विभागीय आयुक्त, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर, कोकण.
१०) प्राचार्य,ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, मांजरी फार्म, पुणे/कसबा बावडा, कोल्हापूर /जालना/ परभणी/ सिंदेवाही जि. चंद्रपूर/बुलढाणा/गारगोटी जि. कोल्हापूर/कोसबाड हिल जि. पालघर व शिवाजीनगर, अमरावती.
११) निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग

**"परिशिष्ट -अ "**

**ग्रामसेवक पायाभूत प्रशिक्षण (सुधारित अभ्यासक्रम)**

- प्रशिक्षण कालावधी : ४५ दिवस, १२ सुट्टया वगळून एकूण ३३ दिवस
- प्रत्यक्ष प्रशिक्षण : ३ २ दिवस
- क्षेत्रभेट : १ दिवस
- एकूण तासिका : १२८ (एक तासिका : ९० मिनिट)
- नांव नोंदणी ,मूल्यांकन व समारोप १ तासिका
- मुल्यमापन चाचणी : १ तासिका
- प्रत्यक्ष तासिका : १२६

| अ.क्र. | | विषय तपशिल | तासिका |
|---|---|---|---|
| १ | | पंचायत राज व्यवस्था पार्श्वभूमी व ७३ वी घटना दुरुस्ती | १ |
| २ | | महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियम महत्वाच्या तरतुदी | |
| | A | ग्रामपंचायत मासिक सभेचे कामकाज नियम, ग्रामसभा तरतुदी, नियम व महिला सभा, वॉर्ड सभा कलम ४९ नुसार ग्रामविकास समित्या व लाभार्थी स्तर समित्या | ४ |
| | B | सभावृत्तांत, लेखन व यासंदर्भात निर्माण होणारे मुद्दे (प्रात्यक्षिक आणि चर्चा) | १ |
| | C | ग्रामपंचायत कर आकारणी-प्रक्रिया व अंमलबजावणी, मिळकत फेर आकारणी | २ |
| | D | ग्रामपंचायतीचे प्रशासकीय अधिकार व कर्तव्ये कलम ४५ (ग्रामसूचीतील तरतुदीनुसार) | २ |
| | E | सरपंच/उपसरपंचांची कार्य कलम ३८, सरपंच/उपसरपंच यांच्या निवडणुकीची कार्यपध्दती कलम ३३ | २ |
| | F | सरपंच, सदस्य अपात्रता, अनहर्तता कलम १४, पदावरुन काढून टाकणे कलम ३९ | १ |

| | | | |
|---|---|---|---|
| | G | ग्रामसेवकांची नियुक्ती, अधिकार, कर्तव्ये व जबाबदाऱ्या- जन्म-मृत्यू व विवाह निबंधक- सचिवांची कर्तव्ये कलम ६० | २ |
| | H | जिल्हा ग्राम विकास निधी, कलम १३३ | १ |
| | I | ग्रामपंचायतीच्या संदर्भात पंचायत समिती, गट विकास अधिकारी, स्थायी समिती, जिल्हा परिषद, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हाधिकारी व विभागीय आयुक्त यांचे अधिकार-महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ नुसार | २ |
| | J | ग्रामपंचायत कर्मचारी आकृतिबंध, नियुक्तीसाठीच्या व काढून टाकण्याच्या तरतूदी, पीएफ संदर्भातील तरतूदी, कामगार कायदा- निगडीत तरतुदी | १ |
| | K | आस्थापना विषयक बाबी : सेवापुस्तक, रजा, वेतन, अंशदायी निवृत्तीवेतन, वर्तणूक नियम, शिस्त व अपिल नियम, विभागीय चौकशी, दुबार सेवा पुस्तक, सेवाप्रवेशोत्तर परिक्षा | ४ |
| ३ | A | ग्रामीण क्षेत्रातील इमारत बांधकाम परवानगीबाबत नियम २०२१ एकात्मिक सर्वसमावेशक विकास नियंत्रण व प्रोत्साहन नियमावली २०२१ महानगर प्राधिकरण क्षेत्रात ग्रामपंचायत येत असल्यास त्यासंदर्भातील तरतुदी, अतिक्रमण नियंत्रण व निष्कसन कलम ५२ व ५३ | ३ |
| | B | वारस नोंदी, इमारत नोंदी व तक्रार निवारण<br>स्वामीत्व योजना (ड्रोन सर्वे द्वारे गावठाणातील भूमापन) - फेरफार ठराव घेण्याच्या कार्यपध्दती. | १ |
| | C | ग्रामपंचायतीने स्वनिधीतून तसेच जिल्हा परिषदेकडून विविध योजनेअंतर्गत प्राप्त होणाऱ्या निधीतून कामे करताना अनुसरावयाची कार्यपध्दती | १ |
| | D | ई-निविदा, बी-१ निविदा प्रक्रिया, वस्तु व सेवा कर, जीईएम पोर्टल, वस्तू व सेवा खरेदीची कार्यपध्दती, जीएसटी, टीडीएस व अन्य शासकीय कपाती कार्यपध्दती | २ |
| | E | रस्ते, इमारती पाणी पुरवठा योजनेसंदर्भातील स्त्रोत, साठवण टाकी इ., स्थावर मालमत्ता नोंदवही-- महत्व व अद्ययावत ठेवण्याची गरज | २ |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | A | महाराष्ट्र ग्रामपंचायत लेखासंहिता, २०११ अंतर्गत नियम व परिशिष्टे अंदाजपत्रक,मूळ पुरवणी व सुधारित विविध घटकांसाठी करावयाच्या खर्चाच्या तरतुदी | ३ |
| | B | ग्रामनिधी व विनियोग कलम ५७, ५८ ग्राम पाणी पुरवठा निधी कलम १३२ (ख) | २ |
| | C | वित्तीय विनियोगाची सर्वसाधारण तत्वे | १ |
| | D | अर्थसंकल्प लेखे १ ते १७-- परस्परसंबंधासह ( ८ व ९ वगळून) वार्षिक प्रशासन अहवाल | २ |
| | E | ग्रामपंचायतीचे दप्तर नियोजन १ ते ३३ ( प्रात्यक्षिकासह), ग्रामपंचायत दप्तर तपासणी- विस्तार अधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी व विभागीय आयुक्त, ग्रामपंचायत लेखा संहिता, नमुना क्रमांक १ ते ८ मध्ये ग्रामपंचायत मासिक व वार्षिक लेखे ठेवणे | ४ |
| | F | ग्रामपंचायतींना वित्तीय सहाय्य | १ |
| | G | ग्रामपंचायतींच्या स्व उत्पन्नाची साधने व उत्पन्न वाढीचे उपाय कलम १२४ ते १२९ | २ |
| | H | ई-पंचायत : ग्रामपंचायत दप्तर संगणकीकरण, ई-बँकींग, आपले सरकार सेवा केंद्र- उपलब्ध होणाऱ्या सेवा सुविधा (संगणकावर प्रात्यक्षिकांसह)<br>इ ग्राम सॉफ्ट, इ-ग्रामस्वराज व अनुषंगिक आज्ञावली (LGD,PFMS)<br>ग्राम मानचित्र, जीआयएस, जीएसडीए मॅप | ४ |
| | I | संगणकीकृत वेतन प्रणाली, सरपंच-उपसरपंच मानधन व सदस्य बैठक भत्ता, आपले सरकार सेवा केंद्र वेतन प्रणाली (प्रात्यक्षिकांसह) | १ |
| ५ | A | लेखा परिक्षण आक्षेप व अनुपालन<br>मुंबई स्थानिक निधी लेखा कायदा १९३०<br>ऑनलाईन लेखा परिक्षण, महालेखापाल लेखापरिक्षण | ३ |
| | B | ग्रामपंचायत कार्यक्षेत्रातील विविध विकास कामे (बांधकामे, सिंचन इ.) ठळक तांत्रिक बाबी अंदाजपत्रक वाचन, तांत्रिक मान्यता, प्रशासकीय मान्यता,मोजमाप पुस्तिका, कॉलीटी टेस्ट बाबत, क्यूरिंग | ४ |

| | | | |
|---|---|---|---|
| ६ | A | सुप्रशासन<br>सेवा हक्क कायदा, माहिती अधिकार अधिनियम, ग्रामस्थांची सनद<br>सहा संच पध्दती व अभिलेख वर्गीकरण<br>सुंदर माझे कार्यालय<br>ग्रामपंचायत आयएसओ मानांकन<br>राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता अभियान | २ |
| | B | कार्यालयीन कामकाज : पत्र व्यवहार, टिप्पणी लेखन<br>अधिकारी-पदाधिकारी परस्पर संबंध<br>राजशिष्टाचार व ध्वज संहिता<br>शुन्य प्रलंबितता<br>**कार्यालयीन विलंबास प्रतिबंध करणाारा अधिनियम** | २ |
| | C | वरिष्ठ कार्यालयास माहिती, अहवाल सांख्यिकी माहिती पाठविण्याचे गरज, महत्व, पध्दत व तंत्र- ई-मेल, एक्सेल | १ |
| | D | मानवविकास संकल्पना, शाश्वत विकासाची ध्येये, मिशन अंत्योदय | १ |
| | E | ग्रामपंचायत विकास आराखडा : पंचवार्षिक व वार्षिक<br>वित्त आयोग निधी व ग्रामपंचायतींच्या क्षेत्रात होणारी विविध विभागामार्फत विकास कामे अनुषंगाने घ्यावयाच्या सर्व सभा-बालसभा, महिलासभा इत्यादी., योजनांचे अभिसरण | २ |
| | F | ग्राम गरिबी निर्मुलन आराखडा<br>आजिविका,महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (उमेद) | १ |
| | G | ग्रामसेवक as a Change Agent | १ |
| ७ | A | पंचायत क्षेत्र विस्तार कायदा १९९६ (पेसा), पेसा गाव, पेसा ग्रामसभा, विशेषाधिकार | २ |
| | B | वनहक्क कायदा (वैयक्तिक व सामुहिक दावे) वनहक्क समिती, संयुक्त वनव्यवस्थापन समिती | १ |

| | | | |
|---|---|---|---|
| | C | जैवविविधता कायदा-- जैवविविधता समिती व जन जैवविविधता नोंदवही (PBR)<br>हवामानातील बदल, नैसर्गिक साधनसंपत्ती, जतन व संवर्धन,माझी वसुंधरा अभियान, राष्ट्रीय बायोगॅस विकास कार्यक्रम, अपारंपारिक उर्जा कार्यक्रम,महाराष्ट्र राज्याचे वातावरणीय बदल अनुकूल धोरण, पर्यावरण विभाग (२५ ऑक्टोबर २०१७) | २ |
| ८ | A | **माझी वसुंधरा अभियान**<br>आर.आर. पाटील (आबा) सुंदर गाव पुरस्कार योजना,वृक्ष लागवड (गावठाण, शेताच्या बांधावर, रस्त्याच्याकडेस, गायरान व वनक्षेत्र) मियाबाकी, मग्रारोहयो, बिहार पॅटर्न,छत्रपती शिवाजी महाराज वनश्री पुरस्कार,आनंद घन- वन योजना,संत तुकाराम वन ग्राम योजना | २ |
| | B | **स्वच्छता**<br>स्वच्छ भारत अभियान (ग्रामीण),प्लॅस्टिक बंदी अधिसूचना, संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान, घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापन, विविध यशोगाथा व भेट | ४ |
| | C | महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी अधिनियमातील तरतुदी व योजना, वृक्ष लागवड, फळबाग लागवड, विहिर पुनर्भरण, अभिसरण व संयोजनातून इतर कामे.,) मी समृध्द तर गाव समृध्द, लेबर बजेट ग्रामसमृध्दी आराखडा ,पाणंद रस्ता, सामाजिक अंकेक्षण | ३ |
| | D | आदर्श गांव संकल्पना : लोक सहभाग, यशोगाथा, नाविन्यपूर्ण उपक्रम, आदर्श ग्राम योजना, सांसद आदर्श ग्राम योजना, आमदार आदर्श ग्राम योजना, मॉडेल स्कूल संकल्पना | २ |
| | E | **ग्राम विकासाच्या विविध योजना/कार्यक्रम**<br>पाणलोट विकास कार्यक्रम- जलव्यवस्थापन आराखडा, पाण्याचा ताळेबंद, जलसुरक्षा आराखडा | २ |
| | F | **विविध अभियाने व पुरस्कार**<br>पंडित दिन दयाळ उपाध्याया पंचायत सशक्तीकरण अभियान, ग्रामपंचायत विकास आराखडा पुरस्कार,नानाजी देशमुख राष्ट्रीय गौरव ग्रामसभा पुरस्कार, बालस्नेही ग्रामपंचायत पुरस्कार, महात्मा गांधी तंटा मुक्ती अभियान | २ |
| | G | विविध सामाजिक सुरक्षा सहाय्य योजना- केंद्र व राज्य पुरस्कृत | १ |

| | | | |
|---|---|---|---|
| ९ | A | **महिला व बालविकास**<br>महिला व बालकांशी संबंधित कायदे, लिंग समभाव संकल्पना<br>बालविवाह प्रतिबंध कायदा २००६,<br>महिलाविषयक योजना- करावयाच्या १०% खर्चाचे नियोजन,महिला व बालसंरक्षण समिती, बालकामगार प्रतिबंध कायदा<br>पाळणाघर संदर्भातील तरतुदी,कौटुंबिक हिंसाचारापासून महिलांचे संरक्षण, महिला बचतगट व संघ स्थापना, ग्राम बालसंरक्षण समिती | ३ |
| | B | एकात्मिक बाल विकास सेवा योजना, संदर्भ सेवा<br>कुपोषणमुक्त ग्रामपंचायत, अंगणवाडी पंचातारांकित करणे | १ |
| | C | बालस्नेही व लिंगभाव अनुकूल पंचायत | १ |
| १० | A | कृषी फलोत्पादन, पशूसंवर्धन, मत्स्य व्यवसाय, यामधील ग्रामपंचायतींची भूमिका<br>(खरीप व रब्बी हंगाम मोहिम, पीक कापणी प्रयोग)<br>पंतप्रधान कृषी सिंचाई योजना, हर खेत को पानी, नानाजी देशमुख कृषी संजीवनी योजना (POCRA), प्रधानमंत्री किसान सन्मान निधी योजना, प्रधानमंत्री किसान ऊर्जा सुरक्षा उत्थान महाअभियान (पी.एम. कुसूम) | २ |
| | B | डॉ. बाबासाहेब आंबेडकर कृषि स्वावलंबन योजना/ बीरसा मुंडा कृषी क्रांती योजना, सेंद्रिय शेती (माती परिक्षण), पीक विमा,गट शेती<br>कामधेनु दत्तक ग्राम योजना, शेतकरी उत्पादक संघ | १ |
| | C | अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्तींच्या विकास योजना<br>ठक्कर बाप्पा आदिवासी वस्ती सुधार योजना, १५% खर्चाचे नियोजन<br>रमाई आवास योजना | १ |
| | D | दिव्यांग व्यक्तीसाठींच्या योजना व कायदेशीर तरतुदी<br>५% खर्चाचे नियोजन | १ |
| | E | सर्व प्रकारच्या घरकुल योजना, बेघरांसाठी जागा देणे संदर्भात योजना व उपाय सर्व घरकुल योजना, दिनदयाळ उपाध्याय योजना, गायरान जागा, गावठाण जागा घरकुलासाठी उपलब्ध करणे | २ |

| | | | |
|---|---|---|---|
| ११ | A | **सार्वजनिक आरोग्य**<br>राष्ट्रीय आरोग्य अभियान, आयुष्यमान भारत, प्रधानमंत्री जन आरोग्य योजना, महात्मा फुले जनआरोग्य योजना, साथरोग नियंत्रण कार्यक्रम, कोरोनामुक्त ग्रामपंचायत अभियान | २ |
| | B | ग्रामरस्ते व गावातील अंतर्गत रस्ते<br>पाणंद रस्ते- ग्रामपंचायत नमूने नंबर २३ ला नोंदी घेणे<br>मनरेगा अंतर्गत पाणंद रस्ता | २ |
| १२ | A | पाणी पुरवठा-<br>योजना व देखभाल दुरुस्ती, पाणी टंचाई- विविध उपाययोजना, भूजल अधिनियम, जलजीवन मिशन | ३ |
| | B | पाणी शुध्दीकरण, पाणी गुणवत्ता,पाणी नमूने तपासणी (जैव व रासायनिक), Yellow, Green,Red,Silver Card | १ |
| | C | पाणलोट व्यवस्थापन, जलसंधारण व जल साक्षरता, जलसंधारण व मृदासंधारण कामे, जलशक्ती अभियान, अटल भूजल योजना, स्वर्गीय मिनाताई ठाकरे ग्रामीण पाणी साठवण योजना, ग्राम आरोग्य पोषण, पाणी पुरवठा व स्वच्छता समिती कार्यवाही | १ |
| १३ | | **आपत्ती व जोखीम व्यवस्थापन :** (पूर, दुष्काळ, ढगफुटी,दरड कोसळणे, वादळ, आग, गारपीट,भूकंप, साथरोग इ.,) प्रतिबंधात्मक उपाययोजना व त्याचा ग्रामविकास आराखडयामध्ये अंतर्भाव ,अंदाजपत्रकात तरतुद करणे, भारतीय साथरोग नियंत्रण कायदा १८९७ | २ |
| १४ | A | **व्यक्तिमत्व विकास**<br>संवाद व संभाषण कौशल्य (प्रात्यक्षिकासह) | २ |
| | B | नितीमूल्याचे महत्व, सामाजिक बांधिलकी | १ |
| | C | वेळेचे व्यवस्थापन<br>ताणतणाव व्यवस्थापन<br>योगा अभ्यास (प्रशिक्षणादरम्यान रोज सकाळी ७ ते ८ या वेळी सत्र) | १ |
| | D | आरोग्य विमा, व्यसनमुक्ती, आर्थिक व्यवस्थापन | १ |

| | | | |
|---|---|---|---|
| | E | आदर्श ग्रामसेवक संकल्पना | १ |
| | F | पंचायत पंचांग व दिनविशेष | १ |
| १५ | A | **महत्वाचे इतर विविध कायदे**<br>महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम-७/१२ वाचन व फेरफार<br>भारतीय दंड संहिता, दिवाणी कायदे, फौजदारी प्रक्रिया संहिता, सायबर गुन्हे, प्रदुषण नियंत्रण कायदा, शिक्षण हक्क कायदा, मिळकत हस्तांतरण कायदा | २ |
| | B | मोफत कायदेविषयक सहाय्य व सल्ला अधिनियम<br>ग्राहक संरक्षण अधिनियम, दारुबंदी अधिनियम,<br>अस्पृश्यता निवारण  अधिनियम, नागरी संरक्षण कायदा | १ |
| | C | लाचलुचपत प्रतिबंधक कायदा | १ |
| १६ | | वैधानिक समिती भेटीची पूर्वतयारी (पंचायतराज, लोकलेखा इत्यादी)<br>अनुसूचित जाती समिती, अनुसूचित जमाती समिती | २ |

****************

## "परिशिष्ट -ब "

## ग्रामसेवक उजळणी प्रशिक्षण (सुधारित अभ्यासक्रम)

- प्रशिक्षण कालावधी : १२ दिवस, २ सुट्टया वगळुन एकूण १० दिवस
- प्रत्यक्ष प्रशिक्षण : १० दिवस
- एकूण तासिका : ४० (एक तासिका : ९० मिनिट)
- नांव नोंदणी व मुल्यांकन ,समारोप १ तासिका
- मुल्यमापन चाचणी : १ तासिका
- प्रत्यक्ष तासिका : ३८

| अ.क्र. | | विषय तपशिल | | तासिका |
|---|---|---|---|---|
| १ | | **महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियम** | | ६ |
| | अ | ग्रामसभा व मासिक सभा,ग्रामविकास समित्या | १ | |
| | ब | ग्रामपंचायत सदस्य अपात्रता, अविश्वास ठराव | १ | |
| | क | महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियमातील महत्वाची कलमे चर्चासत्र | २ | |
| | ड | ग्रामीण क्षेत्रातील इमारत बांधकाम परवानगीबाबत नियम २०२१<br>एकात्मिक सर्व समावेशक विकास नियंत्रण व प्रोत्साहन नियमावली २०२१<br>महानगर प्राधिकरण क्षेत्रात ग्रामपंचायत येत असल्यास त्यासंदर्भातील तरतूदी<br>अतिक्रमण नियंत्रण व निष्कासन कलम ५२ व ५३ | २ | |
| २ | | **महाराष्ट्र ग्रामपंचायत लेखासंहिता,२०११** | | ५ |
| | अ | नमुना नं.१ ते ३३, ग्रामपंचायत दप्तर तपासणी | २ | |
| | ब | लेखापरिक्षण, आक्षेप व अनुपालन | १ | |
| | क | ई-निविदा, बी-१ निविदा प्रक्रिया, वस्तु व सेवा कर, जीईएम पोर्टल, वस्तू व सेवा खरेदीची कार्यपध्दती, जीएसटी, टीडीएस, संगणकीकरण, ई-बँकिंग , सार्वजनिक वित्त व्यवस्थापन प्रणाली (PFMS) व अन्य शासकीय कपाती कार्यपध्दती | २ | |
| ३ | | समाज कल्याण, महिला व बालकल्याण व दिव्यांगासाठी आरक्षीत निधीचे विनीयोग | १ | १ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४ | | **महत्वाच्या योजना** | | २ |
| | अ | आर. आर. पाटील (आबा) सुदंर गाव पुरस्कार योजना ,पंडीत दिनदयाळ पंचायत सशाक्तीकरण पुरस्कार | १ | |
| | ब | महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना,माझी वसुंधरा अभियान | १ | |
| ५ | | **विविध अभियाने** | | २ |
| | अ | स्वच्छ भारत अभियान (ग्रामीण), प्लॅस्टिक बंदी अधिसूचना | १ | |
| | ब | धनकचरा व सांडपाणी व्यवस्थापण क्षेत्र भेट ,संतगाडगेबाबा ग्रामस्वच्छता अभियान | १ | |
| ६ | | **बांधकामे** - अंदाजपत्रक, तांत्रिक मान्यता, प्रशासकीय मान्यता, मोजमाप पुस्तिका लेखन, मुल्यांकन, तांत्रिक मार्गदर्शन | २ | २ |
| ७ | | पाणी पुरवठा - योजना व देखभाल-दुरुस्ती, पाणी टंचाई- विविध उपाययोजना, भूजल अधिनियम जलजिवन मिशन,स्त्रोत बळकटीकरण संदर्भातील कामे | २ | २ |
| ८ | | पाणी शुध्दीकरण, पाणी गुणवत्ता, पाणी नमूने तपासणी | १ | १ |
| ९ | | आरोग्य-साथरोग नियंत्रण कार्यक्रम व भारतीय साथ रोग नियंत्रण कायदा १८९७ आपत्ती व जोखीम व्यवस्थापन आराखडे तयार करणे | २ | २ |
| १० | | **आस्थापना विषयक बाबी** : सेवापुस्तक, रजा, वेतन, निवृत्तीवेतन, सेवाप्रवेशोत्तर परिक्षा , पदोन्नती , सेवा प्रवेश नियम, वर्तणुक, शिस्त व अपिल, विभागीय चौकशी | २ | २ |
| ११ | | ग्रामपंचायत विकास आराखडे (१५ वा वित्त आयोग व इतर अनुदाने) | १ | १ |
| १२ | अ | आदर्श गांव संकल्पना : लोक सहभाग,यशोगाथा,नाविन्यपूर्ण उपक्रम मानव विकास संकल्पना (आरोग्य शिक्षण उपजिवीका), शाश्वत विकास ध्येय | १ | २ |
| | ब | ग्रामसेवक as a Change Agent | १ | |
| १३ | | संगणक व भ्रमणध्वनीचा कार्यालयीन कामकाजात वापर, ॲप्स व सोशल मिडीया | १ | १ |
| १४ | | व्यक्तिमत्व विकास व ताणतणाव व्यवस्थापन | २ | २ |
| १५ | | **महत्वाचे विविध कायदे** | | ३ |
| | अ | फौजदारी प्रकिया संहिता, सायबर गुन्हे, महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम,१९६६ | १ | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | ब | जन्म, मृत्यू व विवाह नोंदणी अधिनियम ,पंचायत विस्तार (अनुसूचित क्षेत्र) अधिनियम १९९६(पेसा) | १ | |
| | क | माहिती अधिकार अधिनियम व सेवा हमी कायदा, | १ | |
| १६ | | प्रकल्प अहवाल सादरीकरण | २ | २ |
| १७ | | आरोग्य आणि वैयक्तिक आर्थिक नियोजन | १ | १ |
| १८ | | पत्र लेखन व वरिष्ठ कार्यालयास पत्रव्यवहार सादर करणे | १ | १ |

*************************